**लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत वितरीत करावयाच्या उडीदडाळीच्या दरामध्ये व रकमा जमा करण्याबाबतच्या कार्यपध्दतीमध्ये बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः अधापु-२०१८/प्र.क्र.१११/ना.पु.२२**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०१ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :- १) शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग समक्रमांक दि. १७.१०.२०१८.**

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने खरेदी केलेला चणा व उडीद यांची भरडाई करुन प्राप्त होणारी चणाडाळ व उडीदडाळ महाराष्ट्र राज्यातील लक्ष्य निर्धारीत सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना व प्राधान्य कुटुंब लाभार्थी यांना अनुदानीत दराने उपलब्ध करुन द्यावयाची प्रक्रिया सुरु करण्यात आली आहे. ई-निविदा प्रक्रियेमध्ये उडीदाचा प्राप्त झालेला उतारा अपेक्षेपेक्षा कमी आल्याने उडीदडाळीच्या वितरीत करावयाच्या दरामध्ये बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच खाजगी संस्थांकडून रकमा जमा करण्यास नाफेडने असहमती दर्शविल्यामुळे नाफेडकडे भरावयाच्या रकमांबाबतच्या प्रक्रियेमध्ये बदल करण्याची बाब देखील शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने संदर्भाधीन दि. १७.१०.२०१८ च्या शासन निर्णयामधील अनुक्रमांक १ व ४ मध्ये पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत :-

**शासन शुध्दीपत्रक :-**

१) दि. १७.१०.२०१८ च्या शासन निर्णयामधील "अनुक्रमांक १" मध्ये नमूद केलेल्या **"प्रतिकिलो ₹ ३५/- या दराने"** याऐवजी **"चणाडाळ प्रतिकिलो ₹ ३५/- व उडीदडाळ प्रतिकिलो ₹ ४४/- या दराने" असे वाचावे.**

२) दि. १७.१०.२०१८ च्या शासन निर्णयामधील "अनुक्रमांक ४" रद्द करण्यात येत असून तो पुढीलप्रमाणे वाचावा :- **"वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांनी केंद्र शासनाकडे केलेल्या मागणी एवढ्या चण्याची व उडीदाची रक्कम नाफेडकडे जमा**

करावी. रास्तभाव दुकानदारांनी त्यांना आवश्यक असलेल्या चणाडाळ व उडीदडाळीची रक्कम चणाडाळीकरिता ₹ ३३.५० व उडीदडाळीकरिता ₹ ४२.५० या दराने मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्रात वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांच्याकडे आणि इतर जिल्ह्यांतील रास्तभाव दुकानदारांनी संबंधित जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये रकमा जमा कराव्यात. संबंधित कार्यालयांनी त्यांच्याकडे रास्तभाव दुकानदारांनी जमा केलेल्या रकमेतून अनुषंगिक खर्चाकरिता ₹ १/- प्रतिकिलो या दराने रक्कम त्यांच्या स्वीय प्रपंजी लेख्यात ठेवून उर्वरीत ₹ ३२.५० चणाडाळीकरिता व ₹ ४१.५० उडीदडाळीकरिता याप्रमाणे रकमा वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांच्याकडे जमा कराव्यात. निविदाधारकाने सदर चणा व उडीद यांची नाफेडच्या गोदामांमधून उचल करण्याकरिता सुरक्षा ठेवीची रक्कम वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांच्याकडे जमा करण्याबाबत वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई यांनी स्वत: तसेच NeML NCDEX Group Company द्वारे संबंधित निविदाकारास सूचना द्याव्यात".

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०११४५१४३८५०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Raghunath Wadikar

Digitally signed by Hemant Raghunath Wadikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9d625ae15602d3ab3345690ad8034be0a2c6937e181f74a8b36405029a161ebf, cn=Hemant Raghunath Wadikar
Date: 2018.11.01 14:58:02 +05'30'

(हेमंत वाडीकर)

कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१६. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१७. सर्व अधिकारी (सचिव वगळून), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१८. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई
२६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
२८.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२९.वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई
३०.प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३१.सर्व उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३२. NCDEX e Market Limited, 1st Floor, Ackruti Corporate Park, LBS Road, Kanjur Marg (W), Mumbai.
३३. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).